**गाळप हंगाम २०२०-२१ करीता राज्यातील ३२ सहकारी साखर कारखान्यांना बँकांकडून एकूण रु.५१६.३० कोटी अल्पमुदत कर्ज घेण्यास शासन शासनहमी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०२०/सपववि/ प्र.क्र.५७/अर्थबळ**
मंत्रालय मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०९ ऑक्टोबर, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शाहमी-१०९९/ प्र.क्र.६८/शा.हमी, दि.५/११/१९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शाहमी-१००८/ प्र.क्र.१८/ शा.हमी, दि.२८/४/२००८
३) मा.मंत्रिमंडळाने दिनांक २२.९.२०२० व दि.७.१०.२०२० रोजीच्या बैठकीत घेतलेला निर्णय

प्रस्तावना -:

साखर आयुक्त यांनी गाळप हंगाम २०२०-२१ साठी दर्शविलेले अंदाजित गाळप विचारात घेऊन राज्यातील ३२ सहकारी साखर कारखान्यांना बँकांकडून एकूण रु.५१६.३० कोटी अल्पमुदत कर्ज घेण्यासाठी व त्यावरील व्याजास शासन हमी देण्याबाबत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने सादर केलेल्या प्रस्तावास मा. मंत्रिमंडळाने दि.२२.०९.२०२० व दि.७.१०.२०२० रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेल्या ३२ सहकारी साखर कारखान्यांना शासन हमी देण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-:

या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेल्या ३२ सहकारी साखर कारखान्यांना (ऋणको) त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या रकमेनुसार एकूण रु.५१६.३० कोटी (रु.पाचशे सोळा कोटी ३० लाख फक्त) इतके अल्पमुदत कर्ज बँकांकडून (धनको) थकहमीद्वारे घेण्यास (व्याज अंतर्भूत करुन) व सदर थकहमीद्वारे घेतलेले कर्ज दि.३०.९.२०२१ पूर्वी व्याजासह वसूल होईल या अटीवर मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन हमीची मुदत दिनांक ३०.९.२०२१ पर्यंत राहील.

३. शासन हमीवर कर्ज घेण्यासाठी धनकोसोबत करण्यात येणा-या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा. करारनाम्याशिवाय किंवा करारनामा स्वाक्षरीत होण्यापूर्वी बँकेने कर्जाचे वितरण केल्यास शासन हमी अवैध ठरेल.

३.१) सदर शासन हमी प्रत्येक कारखान्याच्या नावासमोर दर्शविलेल्या कर्जाच्या रकमेपुरती (व्याज अंतर्भूत करुन) मर्यादित राहील.

३.२) परिशिष्ट अ मध्ये दर्शविलेल्या कारखान्यांनी आपले कार्यक्षेत्रातील संपुर्ण उस गाळप होईपर्यंत कारखाना सुरु ठेवणे बंधनकारक राहील.

३.३) धनकोने परिशिष्ट "अ" मधील नमूद कारखान्यांना मंजूर केलेल्या कर्जाच्या परतफेडीचे वेळापत्रक करारपत्रात नमूद करावे.

३.४) सदर साखर कारखान्यांनी शासन हमीवर घेतलेल्या कर्जाचा वापर कर्ज ज्या प्रयोजनासाठी घेतले आहे त्यासाठीच करणे बंधनकारक राहील.

३.५) परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेले साखर कारखाने प्रमुख ऋणको (Principal Debtor) राहतील.

३.६) संबंधित कारखान्यास शासनाचे पुर्व परवानगीशिवाय सदर प्रयोजनासाठी अन्य कोणतेही कर्ज उभारता येणार नाही.

३.७) परिशिष्ट अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या साखर कारखान्यांच्या संचालक मंडळाची सामुहिक हमी ठरावाद्वारे घेण्यात यावी.

३.८) बँकेच्या कर्ज मंजूरीपत्रातील सर्व अटी व शर्ती कारखान्यांवर बंधनकारक राहतील.

३.९) बँकेच्या नियमानुसार अल्पमुदत कर्जाची परतफेड टॅगिंग केलेली मालमत्ता जसजशी विक्री होईल, त्याप्रमाणात थकहमीची रक्कम कमी होत जाईल.

३.१०) शासन थकहमी देतांना गळीत हंगाम निश्चितपणे सुरु करण्याची व त्यावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी साखर आयुक्तालय व संबंधित बँकेच्या क्षेत्रिय यंत्रणेची राहील.

३.११) धनको कडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरीता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता किंवा इतर कोणत्याही देय रकमेसाठी शासन हमी लागू होणार नाही.

३.१२) कर्जाच्या परतफेडीबाबत होणा-या कसूरीची सुचना शासनास ३० दिवसांच्या आत देणे संबंधित धनकोला बंधनकारक राहील.

३.१३) धनकोने संबंधित कारखान्याकडून कर्ज वसुलीसाठी वरील सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय धनकोला हमी पूर्ततेकरीता शासन हमीचा प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही. संबंधित कारखान्याच्या चल / अचल मालमत्तेची विक्री अथवा लिलाव करुन वसुली करण्याचा निर्णय धनकोने घेतल्यास, त्याकरीता एक समिती गठीत करण्यात यावी व या समितीमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभागाचा प्रत्येकी एक प्रतिनिधीचा समावेश करण्यात यावा. विक्री प्रक्रियेचे अंतिमीकरण शासनाच्या मान्यतेने करण्यात यावे.

वरील परि. ३ मधील कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

**४.** या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठ "अ "मध्ये नमूद केल्याप्रमाणे कर्ज घेण्यासाठी देण्यात आलेली शासन हमी संदर्भाधिन अ.क्र. १ येथील दिनांक ५.११.१९९९ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहील:-

४.१) परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेले साखर कारखाने हे Principal Debtor राहतील.

४.२) शासन हमीवरील देण्यात येणाऱ्या कर्जाची रक्कम व्याजासह कोणत्याही परिस्थितीत रु.२५०/- प्रतिक्विंटल साखर विक्रीवर प्रथम प्राधान्याने टॅगिंग करुन साखर कारखान्यांकडून दि.३०.९.२०२१ पूर्वी वसूल केली जाईल असे हमीपत्र संबंधित बँकांकडून कर्ज वितरणापूर्वी साखर आयुक्तांनी घ्यावे.

४.३) परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेल्या साखर कारखान्यांनी उस पुरवठादार शेतकऱ्यांना FRP ची रक्कम वेळेवर अदा करण्याची दक्षता घ्यावी. यासाठी या कारखान्यांकडून साखर आयुक्त यांनी हमीपत्र घ्यावे व सदर साखर कारखाने उस पुरवठादार शेतकऱ्यांना FRP ची रक्कम वेळेवर देतील यावर देखरेख ठेवावी.

४.४) परिशिष्ट"अ" मधील ३२ कारखान्यांच्या यादीतील अ.क्र. १९ येथील राजगड स.सा.का. लि., ता. भोर, जि. पुणे व अ.क्र. २४ येथील श्री विठ्ठल स.सा.का. लि., वेणुनगर, गुरसाळे, ता. पंढरपूर, जि. सोलापूर यांना सन २०१९-२० मध्ये अनुक्रमे रु.१२ कोटी व रु.६० कोटी इतक्या अल्पमुदत कर्जास शासन हमी देण्यात आलेली आहे. सदर दोन्ही कारखान्यांनी सदर शासन हमीवर घेतलेल्या कर्जाची व्याजासह माहे सप्टेबर,२०२१ पर्यंत परतफेड करणे आवश्यक आहे या अटीवर त्यांना सन २०२०-२१ ची थकहमी देण्यात येत आहे.

४.५) मा. मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार यापुढे भविष्यात जोपर्यंत सदर ३२ कारखाने सर्व जूनी तसेच आता देण्यात आलेल्या थकहमीची परतफेड करीत नाहीत, तोपर्यंत त्यांना पुढचे कोणतेही कर्ज उचलण्यासाठी नवीन शासन हमी दिली जाणार नाही.

४.६) मा. मंत्रिमंडळाने दि.२२.९.२०२० रोजी व दि.७.१०.२०२० घेतलेल्या निर्णयातील अन्य सर्व अटींची / निर्देशांची पूर्तता होईल याची दक्षता घेण्याची जबाबदारी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाची /साखर आयुक्त यांची राहील.

४.७) धनकोकडून घेण्यात आलेल्या कर्जाचा वापर ज्या प्रयोजनासाठी कर्ज घेण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी करण्यात यावा व त्याप्रमाणे पूर्तता अहवाल साखर आयुक्तांना सादर करावा.

४.८) सदरचे कर्ज (मुद्दल + व्याज ) फेडण्याची संपूर्ण जबाबदारी सदर कारखान्याची राहील.

४.९) वरील प्रमाणे आवश्यक ती कार्यवाही व सनियंत्रण करण्याची जबाबदारी सहकार विभागाची/ साखर आयुक्त यांची राहील.

४.१०) शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जाचे दायित्व शासनावर येणार नाही याबाबतची संपुर्ण जबाबदारी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग/साखर आयुक्त पुणे यांची राहील.

४.११) परिशिष्ट “अ” मध्ये नमूद केलेल्या ३२ सहकारी साखर कारखान्यांनी दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती साखर आयुक्तांनी सहकार, पणन व वस्त्रोद्योग / वित्त विभाग (ऋण व हमी संनियंत्रण कक्ष) यांच्या कडे सादर करावी.

४.१२) परिशिष्ट “अ” मध्ये नमूद केलेल्या ३२ सहकारी साखर कारखान्यांनी विहित कार्यपध्दतीने लेखा परिक्षित केलेल्या संस्थेच्या लेख्यांची एक प्रत शासनास सादर करावी.

४.१३) परिशिष्ट “अ” मध्ये नमूद केलेल्या ३२ सहकारी साखर कारखान्यांनी त्यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-“ब” मध्ये दर सहा महिन्यांनी (३०मार्च/३०सप्टेंबर) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागास सादर करावा.

५. <u>हमी शुल्क</u>

५.१) परिशिष्ट “अ” मध्ये नमूद केलेल्या ३२ सहकारी साखर कारखान्यांनी सदर शासन हमीवर घेतलेल्या कर्जासाठी हमीशुल्काचा दर प्र. श.प्र.व. रु.२/- असा राहील.

५.२) हे हमीशुल्क ज्या कालावधीकरिता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर देय राहील.

५.३) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यांनी करण्यास संबंधित साखर कारखाने जबाबदार असतील. प्रत्येक वित्तीय वर्षाच्या ३१ मार्च आणि/ अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या कर्जावर देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा अनुक्रमे १ एप्रिल आणि / अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

५.४) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास संबंधित साखर कारखान्यांकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

५.५) संबंधित साखर कारखान्यांनी शासन हमी शुल्काची रक्कम "८२३५-सर्वसाधारण व इतर राखीव निधी, ११७-हमी विमोचन निधी (८२३५५०४५०१)" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी.

५.६) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची साक्षांकित प्रत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने वित्त विभागास पाठवावी.

५.७) संबंधित साखर कारखान्यांनी देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग तसेच, साखर आयुक्त हे संबंधित कारखान्याकडून वसूल करेल, अन्यथा शासन हमी अवैध ठरेल.

५.८) शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत व नियत दिनांकास हमीशुल्क वसुल करण्याची व संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव/ उपसचिव, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

६. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र.ससाका-२०२०/प्र.क्र.६२/३स व ससाका-२०२०/प्र.क्र.७४/३स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र.- २/२०२०-२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. संबंधित साखर कारखान्यांनी धनकोकडून कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील संबंधीत सहसचिव/ उपसचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२०१००९१८४६४७५८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Balkrishna Kulkarni

Digitally signed by Jayant Balkrishna Kulkarni
DN: CN = Jayant Balkrishna Kulkarni, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2020.10.09 18:55:03 +05'30'

**सोबत: परिशिष्ट अ व ब**

**( ज. बा. कुलकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
८) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
९) उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
१०) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती )
१४) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२०.

१५) इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.

१६) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई.

१७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.

१८) बहुजन समाज पार्टी, महाराष्ट्र राज्य, बी.एस.पी. भवन, प्लॉट नं.८३-अे, कलेक्टर कॉलनी चेंबूर, मुंबई-४०००१४.

१९) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-०४.

२०) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-२८.

२१) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.

२२) प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

२३) सहकार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे

२४) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजी नगर, पुणे-४११००५.

२५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

२७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

२८) संबंधित सर्व सहकारी साखर कारखाने.

२९) वित्त विभाग (ऋण व हमी संनियंत्रण कक्ष/व्यय-२), मंत्रालय, मुंबई-३२.

३०) कक्ष अधिकारी (३ स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३१) निवडनस्ती/ अर्थबळ.

*******

शासन निर्णय क्र. शाहमी-२०२०/सपववि/ प्र.क्र. ५७/अर्थबळ, दि. ९/१०/२०२० अन्वये शासन हमी देण्यात आलेल्या सहकारी साखर कारखान्यांची नावे व कर्जाची रक्कम दर्शविणारे विवरणपत्र

**परिशिष्ट-"अ"**

| अ.क्र. | शासन हमी देण्यात आलेल्या सहकारी साखर कारखान्याचे नाव | कर्जाची रक्कम (रु.कोटीत) |
|---|---|---|
| १. | स.म.शं.कोल्हे स.सा.का. लि., कोपरगाव, जि. अहमदनगर | १८.२२ |
| २. | कुकडी स.सा.का. लि., पिंपळगाव, ता. श्रीगोंदा, जि. अहमदनगर | १८.०० |
| ३. | श्री वृध्देश्वर स.सा.का. लि., आदिनाथ नगर, ता. पाथर्डी, जि. अहमदनगर | १०.८७ |
| ४. | डॉ. वि.वि.पाटील स.सा.का. लि., प्रवरानगर, जि. अहमदनगर | २३.८४ |
| ५. | लो. सुंदरराव सोळुंके स.सा.का. लि., सुंदरनगर, ता. धारुर, जि.बीड | १९.६२ |
| ६. | श्री रेणुकादेवी शरद स.सा.का. लि., पैठण, जि. औरंगाबाद | ०४.७५ |
| ७. | वैद्यनाथ स.सा.का. लि., परळी, जि. बीड | १६.५६ |
| ८. | जयभवानी स.सा.का. लि., गेवराई, जि. बीड | ०९.७२ |
| ९. | मोहनराव शिंदे स.सा.का. लि., मोहननगर, पो. आरग, जि. सांगली | १८.२६ |
| १०. | कुंभी-कासारी स.सा.का. लि., कुडित्रे, ता. करवीर, जि. कोल्हापूर | २६.३० |
| ११. | प.क्रां.डॉ.ना.ना.हु.किसन अहीर स.सा.का. लि., ता. वाळवा, जि. सांगली | १८.१३ |
| १२. | भाऊराव चव्हाण स.सा.का. लि., यु-१, अर्धापूर, जि. नांदेड | १५.८१ |
| १३. | भाऊराव स.सा.का. लि., यु-२, जि. हिंगोली | ०८.५१ |
| १४. | टोकाई स.सा.का. लि., कुरुंदा, ता. वसमत, जि. हिंगाली | ०५.३९ |
| १५. | विघ्नहर स.सा.का. लि., जि. पुणे | २४.०० |
| १६. | रावसाहेब पवार घोडगंगा स.सा.का. लि., न्हावरे, ता. शिरुर, जि. पुणे | २०.२७ |
| १७ | श्री छत्रपती स.सा.का. लि., भवानी नगर, जि. पुणे | २८.४२ |
| १८. | निराभिमा स.सा.का. लि., शहाजी नगर, ता. इंदापूर, जि. पुणे | १५.४० |
| १९. | राजगड स.सा.का. लि., ता. भोर, जि. पुणे | १०.०० |
| २०. | किसनवीर खंडाळा स.सा.का. लि., म्हावशी, ता.खंडाळा, जि. सातारा | ११.६० |
| २१. | किसनवीर सातारा स.सा.का. लि., भुईंज, ता. वाई, जि. सातारा | १८.९८ |
| २२. | श्री विठ्ठल साई स.सा.का. लि., मुरुम उमरगा, जि. उस्मानाबाद | १०.८५ |
| २३. | डॉ. बाबासाहेब आंबेडकर स.सा.का. लि., केशेगाव, जि. उस्मानाबाद | २२.०८ |
| २४. | श्री विठ्ठल स.सा.का. लि., वेणुनगर, गुरसाळे, ता. पंढरपूर, जि. सोलापूर | ३०.९६ |
| २५. | श्री संत दामाजी स.सा.का. लि., मंगळवेढा जि. सोलापूर | १०.५८ |
| २६. | स.म.शं.मोहिते-पाटील स.सा.का. लि., अकलूज, जि. सोलापूर | ३३.२४ |
| २७. | श्री रामेश्वर स.सा.का. लि., जालना | ०९.३३ |
| २८. | अंबाजोगाई स.सा.का. लि., अंबाजोगाई, जि. बीड | ०९.७२ |
| २९. | श्री संतशिरोमणी मारुती महाराज स.सा.का. लि., औसा, जि. लातूर | ०७.०० |
| ३०. | संत कुर्मदास स.सा.का. लि., माढा, जि. सोलापूर | ०५.१५ |
| ३१. | भीमा स.सा.का. लि., ता. मोहोळ, जि. सोलापूर | २०.२२ |
| ३२. | सहकार शिरोमणी वसंतराव काळे स.सा.का. लि., पंढरपूर, जि. सोलापूर | १४.५२ |
| | **एकूण** | **५१६.३०** |

*****************

# ANNEXURE B

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from: To**

**Guarantee & Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Toal Outstanding ( 1+ 2 ) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period ( 3 - 4 ) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance ( 5 - 6 ) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G . F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No. | | | |
| 5 | Balance at end of the period ( 1 - 2 ) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (!) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

( P.T.O.)

| | |
|---|---|
| 9 Types of inspection of assets / due diligency by lending institute during last 6 months to ensure loans are properly secured. | |
| 10. Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the Principal Debtor<br>(II) Total Profits<br>(iii) % of profits as % of loan amount | |
| 11. Is in the opinion of lending institute,the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| 12. Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| 13. If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| 14. Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| 15. Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |